**मोटार वाहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी (गट-ब) संवर्गातील अधिका-यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर सेवापुनर्विलोकन करणेबाबत...**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी ०२०२/प्र. क्र.३७/परि-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १३ मे २०२०

<u>वाचा -</u>

**१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दिनांक १०.०६.२०१९**
**२) गृह विभाग शासन निर्णय क्र. एमव्हिडी ०७१९/प.क्र. १७१/परि-४, दि.०२.०८.२०१९**
**३) विभागीय पुनर्विलोकन समितीची बैठक दि.१३.०२.२०२०**

**<u>प्रस्तावना -</u>**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६२ नुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशायास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचा-यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवापुनर्विलोकन करुन त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. त्यानुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. १ येथील दि.१०.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सेवापुनर्विलोकनासंबंधी कार्यपद्धती व सर्वसाधारण सूचना विहित केल्या आहेत. त्यास अनुसरुन मोटार वाहन विभागातील १)गट-अ (राजपत्रित)(वरिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० व त्यापेक्षा अधिक परंतु १०००० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी ,२) गट-अ (राजपत्रित)(कनिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी संवर्गातील अधिकारी तसेच गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या सेवापुनर्विलोकनाकरिता संदर्भ क्र. २ येथील दि.०२.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रधान सचिव (परिवहन) यांचे अध्यक्षतेखाली विभागीय पुनर्विलोकन समितीची स्थापना करण्यात आली आहे.

मोटार वाहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे आगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवापुनर्विलोकन करण्यासाठीचा विहित प्रस्ताव प्रधान सचिव (परिवहन) यांचे अध्यक्षतेखालील विभागीय पुनर्विलोकन समितीच्या दि.१३.०२.२०२० रोजीच्या बैठकीत सादर करण्यात आला. विभागीय पुनर्विलोकन समितीने सदर अधिका-यांच्या सेवेचे मुल्यमापन करुन केलेल्या शिफारशी नुसार ज्या अधिका-यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे आगोदर घडेल त्यावेळी सेवेत राहण्यासाठी पात्र ठरविले आहे त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विभागीय पूनर्विलोकन समितीच्या दिनांक १३.०२.२०२० रोजी झालेल्या बैठकीतील शिफारशीस अनुसरुन मोटार वाहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-ब संवर्गातील सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमूद केलेल्या अधिका-यांची सेवा त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे आगोदर घडेल त्यानंतर चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये नमूद अधिका-यांची सेवा ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळाल्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५१३१३११२३१८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.05.13 13:16:04 +05'30'

**(द. ह. कदम)**
**अवरसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), १/२, मुंबई/नागपूर
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. परिवहन उप आयुक्त (प्रशासन),परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई
५. संबंधित प्रादेशिक / उप प्रादेशिक परिवहन अधिकारी
६. संबंधित सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, (परिवहन आयुक्त यांचे मार्फत)
७. निवडनस्ती, परि-४

**शासन निर्णय क्रमांक एमव्हीडी-०२२०/प्र.क्र. ३७/परि-४, दिनांक १३.०५.२०२० सोबतचे प्रपत्र मोटार वाहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-ब संवर्गातील वयाच्या ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर सेवा पुढे चालू ठेवण्यास पात्र ठरलेल्या अधिका-यांची यादी**

| अ.क्र. | अधिका-यांचे नाव |
|---|---|
| १ | श्री. राजेंद्र एकनाथ नेरकर |
| २ | श्री. प्रसाद वसंत दळवी |
| ३ | श्री. राजेंद्र कचरु नवले |
| ४ | श्री. अनिल शांताराम अहेर |
| ५ | श्री. महेंद्र रघूनाथ पाटील |
| ६ | श्री. राजेंद्र निळकंठ सावंत |
| ७ | श्री. सुबोध शिवाजीराव मेडशीकर |
| ८ | श्री. तानाजी परसू चव्हाण |
| ९ | श्री. हेमंत गजानन पाटील |
| १० | श्री. महेश दादाराव देवकाते |
| ११ | श्री. राजेश जनार्दन सरक |
| १२ | श्री. शामराव महादेव शेटे |
| १३ | श्री. खंडेराव मरुतराव देशमुख |

*****